# वर्तमान नैतिक संकटे

## आणि

# इस्लाम

लेखक

डॉ. फजलुर्रहमान फरीदी

अनुवाद

जावेद तडवी

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

वर्तमानकाळातील एक मौलिक समस्या वैयक्तिक एवंम् सामूहिक नैतिक संकट आहे. आज नैतिकतेच्या क्षेत्रासाठी सुदृढ आधार अस्तित्वात नाही. आजच्या समाजात नैतिकता एक निरर्थक वस्तू समजून घेतली गेली आणि भौतिकवाद प्रभावी झालेला आहे. मानवात ना नैतिक जीवन व्यतीत करण्याची भावना आढळून येते आणि ना अशी प्रेरक तत्त्वे अस्तित्वात आहेत, जे मानवाला नैतिक मूल्यांच्या आचरणावर तत्पर करू शकतील. सामाजिक परिस्थिती इतकी विकृत झालेली आहे की नैतिक मूल्यांवर चालणे कठीण बनले आहे. आजचा समाज याच्या ऱ्हासाला सोपे बनवित आहे आणि यासाठी अनुकूल वातावरण उपलब्ध करीत आहे.

समाज निर्माणाशी संबंध ठेवणाऱ्या प्रत्येक चळवळीची सफलता कोणत्या ना कोणत्या प्रकारच्या नैतिकतेवर निर्भर राहत असते. कम्युनिस्ट समाज जरी नैतिकता आणि धर्मास रद्द करतो, परंतु एका विशिष्ट नैतिकतेला प्रसारित करू इच्छित असतो. या उद्देशासाठी तोसुध्दा बळजबरी ने काम घेत असतो आणि कधी सामाजिक संस्थाचे आणि संघटनांचे आपल्या इच्छेनुसार गठन करीत असतो जेणेकरून त्याद्वारे निर्मित नैतिकतेचा पाया दणकट व्हावा.

भांडवलशाही व्यवस्थेबाबत विभिन्न विद्वानांनी एका विशिष्ट प्रकारच्या नैतिक मूल्यांना भांडवलशाहीच्या विकासाला जबाबदार घोषित केलेले आहे. जसे वित्तीय नीती, कर नीती आणि संपत्तीच्या सीमांकनाच्या नीती आपण कितीही चांगल्या योजना बनवून घ्या, परंतु त्या सफल होऊ शकत नाहीत, जोपर्यंत त्याच्या मागे अपेक्षित नैतिक मूल्य विद्यमान नसतील.

ही समस्या त्या वेळेस आणखीन जास्त कठीण होऊन जाते जेव्हा पूर्ण समाजाचे कल्याण अपेक्षित असते. जसे आर्थिक प्रगतीसोबत हेसुध्दा अपेक्षित असते या प्रगतीचे लाभ सर्वसामान्यांपर्यंत पोहचावेत. आर्थिक प्रगती कोणत्या वर्गापर्यंत सीमित न राहता सर्वसामान्यांपर्यंत याची पोहोच असावी आणि आर्थिक न्यायाचे चलन असावे. या संबंधामध्ये विभिन्न नितींचा वापर केला जातो. परंतु हा न्याय प्राप्त करण्यात एक सीमित लांबीपर्यंत जाऊ शकता येते. याची सफलता व विफलता अर्थ तंत्र चालविणाऱ्या हातांचा प्रामाणिकपणा आणि उत्तरदायित्वाच्या प्रति त्यांची संवेदनशीलता आणि त्याग भावनेवर निर्भर आहे. यासारख्या नैतिक गुणांना पल्लवित केल्याशिवाय आर्थिक प्रगतीच्या उपादेयता सर्वसामान्यांपर्यंत पोहचू शकत नाही.

आज आर्थिक प्रगती आणि जीवनस्तराची उच्चता ज्या गुणांवर अवलंबून आहे

त्यात सर्वांत महत्त्वपूर्ण धनलोलुपता आणि स्वार्थ आहे. यांच्यामध्ये आणि त्या नैतिक गुणांमध्ये जे आम मानवतेला जीवनाच्या देणग्यांनी भरू शकतात, विरोधाभास आढळतो. यासाठी या दोन्ही प्रकारच्या गुणांमध्ये संतुलन आणि सामंजस्य स्थापित करणे जरूरी आहे. परंतु वास्तवता अशी आहे की वर्तमान भारतीय समाजात धनलोलुपता आणि उच्च जीवनस्तराची इच्छा प्रबळ होत चालली आहे आणि याच्याविरुद्ध त्यागाच्या भावने समान नैतिक गुण विलुप्त होत चालले आहेत.

## महिला उत्पीडन

अर्थ तंत्राशिवाय सामाजिक जीवनाच्या अन्य क्षेत्रांची प्रगतीसुद्धा नैतिक मूल्यांवर आधारित आहे. उदाहरणार्थ, मानव वेग पारस्पारिक संबंधांचा पाया जोपर्यंत आपसातील प्रेम आणि सहयोगावर आधारित नसेल तर प्रत्येक प्रगती प्रकोप बनून जाते आणि सुधारणेचे प्रत्येक पाऊल उपद्रवाचे कारण बनून जाते. पारिवारिक जीवन सुधारासाठी जे पाऊल कठोर कायद्याच्या रूपात उचलले जाते, ते न्यायाऐवजी स्वत: हा अन्यायाचा बहाणा बनत असतो.

स्त्री शतकांपासून शक्तीहीन राहिली आहे. तिला ती साधनेसुद्धा उपलब्ध नाहीत जी पुरुषांना आज प्राप्त आहेत. यासाठी ती आपल्या अधिकारांसाठी फक्त हातपाय मारीत आहे. परंतु त्यांच्यापर्यंत पोहचणे तिला फार दुष्कर झाले आहे.

स्त्री-पुरुष समानतेच्या समस्त दाव्यांच्या अस्तिवासहित भारतीय महिला आज ही शक्तीहीन आणि अत्याचारपीडित आहे. तिचे प्रदत्त अधिकार त्याच वेळेस परिणामकारक होऊ शकते. जोपर्यंत असे नैतिक वातावरण उत्पन्न केले जाईल की ज्यात तिला पुरुषांचे अधीन समजले जाणार नाही, प्रेम आणि परस्पर सहयोगाची भावना वाढीस लागेल.

पारिवारिक जीवनाच्या सुरक्षेसाठी ख्रिश्चन समाजात एका काळापर्यंत घटस्फोटास जवळजवळ असंभव बनवून टाकले होते. परंतु यामुळे सामाजिक सुदृढता तर काय येईल, अत्याचार आणि शोषणाचे विभिन्न मार्ग विस्तृत झाले. पती-पत्नी स्वाभाविक संबंधांच्या जागी चुकीच्या आणि अनैतिक पध्दती स्वीकारल्या गेल्या.

भारतात पतीच्या स्वातंत्र्यावर बंदी आणण्यासाठी घटस्फोटानंतर पोटगीची जबाबदारी लागू करून दिली गेली. परंतु संख्या दाखविते की घटस्फोटानंतर पोटगी प्राप्त करण्यासाठी शक्तीहीन आणि असहाय स्त्रीला न्यायालयांचे इतक्या फेऱ्या माराव्या लागतात की अंतत: अधिकतर महिला नाराज होऊन जातात.

राजनैतिक जीवनात दलित वर्गांसाठी जी पाऊले उचलली गेली आहेत, ती बहुआयामी आहेत, परंतु हे असूनसुद्धा त्यांचे अत्याचार आणि दमन समाप्त झालेले नाही. त्यांच्या स्त्रियांसोबत बलात्कार आणि अत्याचारांच्या घटना दररोज वर्तमानपत्रातून

येत असतात. त्यांच्या वस्त्या आजही उजाडल्या जातात, त्यांची प्राण-संपत्ती नष्ट केली जाते. आज यांना समाजात हीन दृष्टीने पाहिले जात असते आणि त्यांना व्यवहारात: आजसुद्धा समानतेचे स्थान समाजात प्राप्त होऊ शकले नाही. परंतु विडंबना आहे की इतर व दलीत नेता त्यांच्या पाठीवर स्वार होऊन त्यांच्या वाईट परिस्थितीची खिल्ली उडवीतात. आपले जग सुधारण्यासाठी त्या शक्तीहीनांच्या वाईट परिस्थितीला राजनीतिक शक्तीचे माध्यम बनवित असतात.

## व्यापक नैतिक पतन

हे नैतिक पतन जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रावर प्रभावी आहे. याचा बिघाड इतका व्यापक आणि याचा अंधार इतका गडद आहे की सर्वसामान्यांशिवाय विशिष्ट जनसुद्धा त्रस्त आहेत. सामाजिक जीवनात चारित्रिक आचरणाचा जो विकार उत्पन्न आहे. त्याच्या व्याख्येची आवश्यकता नाही. परंतु काही महत्त्वपूर्ण नैतिक विकार असे आहेत, ज्यांचा उल्लेख करणे प्रासंगिक ठरेल.

## सामाजिक विकृती

सर्वांत प्रमुख विकृती आपल्या समाजात मानव-जीवन आणि मानसन्मानाचे हनन आहे. हिंसा आणि उपद्रव आहे. ज्या कोणा जवळ शक्ती आणि संसाधने आहेत, तो आपल्या उद्देशाला प्राप्त करण्यसाठी हिंसेला कायद्यावर वरिष्ठता देत असतो. आधी हे काम ते लोक करीत असत, ज्यांचा पेशा अपराध आणि मादक पदार्थ होता आणि त्यांचे समाजात कोणतेही स्थान नव्हते. परंतु आता ही रूची त्या लोकांमध्येसुद्धा निर्माण होत आहे जे स्वत:ला सुसभ्य आणि शिक्षित म्हणत असतात. इथपर्यंत की किशोरवयीन मुले आणि मुलींमध्येसुद्धा हिंसा आणि अपराधाची वृत्ती गतीने पसरत आहे. नेतागण आणि त्यांचे सहयोगीसुद्धा दुस्साहसाने हत्या करतात आणि करवितात, ज्यांचा पुरावा निवडणुकीतील हिंसा आहे. अपराध (गुन्हेगारी) आणि हिंसेला आपल्या समाजात आता सन्मान मिळायला लागलेला आहे. याचे एक रुप हे आहे की विभिन्न राजनैतिक दल निवडणुकांच्या वेळी अपराधींना आणि हत्याऱ्यांना केवळ तिकिट देतात असे नाही तर त्यांना मंत्रीपदावर आसीनसुद्धा करून टाकत असतात.

अहवालानुसार, उत्तर प्रदेशांच्या मंत्रीमंडळात अनेक लोक असे आहेत, ज्यांच्यावर हत्या आणि दंग्यांचे अनेक दावे (प्रकरणे) चालत आहेत. हत्या आणि दंगे आता धार्मिक उपद्रवाचेसुद्धा कारण बनले आहेत. जसे स्टेन्स आणि त्यांच्या दोन अबोध मुलांची हत्या, आताच एका ख्रिश्चन पादरीची हत्या, सांप्रदायिक दंग्यांच्या स्थळांवर आणि बाबरी मस्जिद विध्वंसानंतर मुंबई आणि अन्य स्थळांचे दंगे या सर्व घटना मानव जीवनाच्या अवमाननेचे ठोस पुरावे आहेत.

वैवाहिक जीवनात हत्येच्या घटना आता सार्वत्रिक होत चालल्या आहेत. यांच्यामधून काही प्रसारमाध्यमांमुळे समोर येत असतात. आता काही वर्षांआधी एका राजनैतिक पक्षाचे युवा नेता सुशील शर्माने आपली पत्नी नैना साहनीची हत्या केली आणि तिच्या मृतदेहाचे तुकडे करून तंदुरभट्टीत फेकून दिले. या जघन्य अपराधासाठी न्यायालयाने त्याला फाशीची शिक्षा सुनावली आहे. समाजात हिंसा आणि हत्येची शिकार अधिकतर अत्याचारपीडित महिला होत आहेत. कितीतरी दलित महिला अशा आहेत, ज्यांची इज्जत-अब्रू लुटल्यानंतर त्यांची हत्या करून टाकण्यात आली.

मानव जीवनाच्या अवमाननेचा सर्वांत दु:खदायक भाग हा आहे की आता हत्येसारखा घोर अपराध आपल्या भौतिक आणि राजनैतिक हितांच्या पूर्तीसाठीचा सार्वत्रिक मार्ग समजून घेतला गेलेला आहे. धन संपत्ती आदिंसाठी हत्या पूर्वीसुद्धा होत होत्या परंतु ही प्रवृत्ती इतकी प्रगती करून गेलेली आहे की विचारांचे मतभेदसुद्धा याच प्रकारे हत्या करून सोडविले जात असतात. काही दिवसांपूर्वी बातमी आली होती की दिल्लीमध्ये दोन युवा मित्र कोणत्या मुद्द्यावर चर्चा करीत होते. की एकाने दुसऱ्याची हत्या करून टाकली. रेल्वेमध्ये बैठकीचे भांडण आणि चित्रपटाचे तिकीट घेण्यावर भांडणसुद्धा कधीकधी हत्येचे कारण बनून जात असतात. (हिन्दुस्तान २७ जानेवारी २००४ (दिल्ली) अनुसार प्रधानमंत्री अटलबिहारी वाजपेयी यांचा पुतण्या महेंद्र कुमारांचे पुत्र मनीष तथा अन्य दोन युवकांना २४-१-०४ च्या सायंकाळी विलासपूरहून दिल्ली जाणाऱ्या एक ट्रेनमधून कोसीजवळ चालत्या गाडीतून काही लोकांनी काही विवादावरून खाली फेकून दिले. या दुर्घटनेवरूनसुद्धा नैतिक संकटाचा अनुमान लावला जाऊ शकतो.)

## कन्या - भ्रूणहत्या

मानव जीवनाच्या अवमानतेचे एक अत्यंत घृणास्पद रूप नवजात कन्या शिशुंची हत्या आहे. भारतात या युगातसुद्धा काही राज्यांमध्ये जसे केरळ, ओरिसा, बिहारमध्ये हा प्रकार आहे की माता स्वत: मोलकरणीच्या मदतीने आपल्या नवजात मुलींची निर्मम पध्दतींनी जन्माच्या काही महीन्यानंतर या भयाने हत्या करून टाकते की यांच्यामुळे हुंड्याचा प्रबंद करावा लागेल.

टाईम्स ऑफ इंडिया (२२ सप्टेंबर १९९९) मध्ये एक रिपोर्ट प्रकाशित झाला आहे, ज्यामध्ये सांगितले गेले आहे की राजस्थानच्या एका गावात ११० वर्षांनी (एकशे दहा वर्षांनी) पहिल्या वेळेस तिथल्या एका मुलीचे लग्न झाले. यासाठी की बाडमेर जिल्हाच्या या देवार गावात एका लांब कालावधीपर्यंत मुलीच्या जन्माचा रिपोर्ट मिळाला नाही. या स्थितीचे दु:खद कारण हे आहे की कोवळ्या निष्पाप मुली गळा दाबून किंवा विष देऊन मरणाच्या दारात फेकल्या जातात. वृत्तपत्रानुसार आधुनिक पध्दतीचा भ्रूणहत्या करण्यासाठीसुद्धा मोठ्या प्रमाणावर उपयोग केला जातो.

हुंड्यांच्या कारणामुळे नववधूं हत्येच्या बातम्या वृत्तपत्रांमध्ये बरोबर येत राहतात.

## सुरक्षाबलांची अमानवीयता

ही प्रवृत्ती फक्त सर्वसामान्यांमध्ये आढळली जात नाही, तर प्रशासनाच्या त्या लोकांमध्येसुद्धा मोठ्या प्रमाणावर अस्तित्वात आहे जे शांती स्थापनेसाठी जबाबदार आहेत. यातना आणि कैदेतील मृत्यू आता रोजच्या घटना बनलेल्या आहेत. मानवाधिकारांच्या आंतरराष्ट्रीय सिम्पोजीयमच्या प्रबंध समितीचे अध्यक्ष न्या. वी. एस. मलमैध आपल्या एका भाषणात म्हणतात की देशातील पोलीस स्टेशनांमध्येसुद्धा यातना देण्याच्या घटना होत आहेत.

मानवाधिकार संगठन 'पिपल्स युनियन फॉर सिवील लिबर्टीज'च्या रिर्पोटनुसार, सैनिक आणि अर्धसैनिक बलांनी काश्मीरमध्ये निरपराध लोकांची हत्या आणि स्त्रियांच्या बेईज्जतीला आपला धंदा बनवून घेतला आहे. काश्मीरच्या न्यायालयांमध्ये अशी शेकडो प्रकरणाची नोंद आहे. ज्यांमध्ये पोलीस आणि सेनेचे जवान आरोपी आहेत. हा व्यवहार त्या लोकांसोबत होत आहे जे या देशाचे नागरिक आहे आणि त्या क्षेत्रामध्ये होत आहे ज्याला आपण या देशाचा अतुट अंग म्हणत असतो.

उत्तराखंड आंदोलनाच्या काळात मुजफ्फरनगर आणि अन्य क्षेत्रांमध्ये पोलीस कर्मचाऱ्यांनी मोठ्या प्रमाणावर महिलांना अपमानित केले आणि शांतीप्रिय लोकांमधून कित्येक लोकांना गोळीचा बळी बनविले. काही महिन्यांआधी आंध्र प्रदेशात पोलीसांच्या उत्पीडनाने त्रस्त होऊन अनेक लोकांनी आत्महत्या केली. सन १९९३ च्या दंग्यांमध्ये निष्पाप (गरीब) लोकांच्या घरांना जाळले गेले आणि कित्येक लोकांना गोळ्यांनी भाजून टाकले गेले. बिहारच्या जेलमध्ये पोलिसांनी २२ कैद्यांचे डोळे फोडून टाकले होते. हे सर्व शांतीव्यवस्थेच्या नावावर होत आहे. याचा अपमानास्पद भाग हा आहे की भय आणि आतंक पसरविण्यासाठी स्त्रियांच्या इज्जतीला खास बळी बनविले जाते. हे त्या देशात होत आहे, जिथे लोकतंत्र स्थापित आहे व जिथे मानवाधिकारांच्या विभिन्न संघटना सक्रीय आहेत.

हिंसेचे सार्वत्रिक होण्याचे एक कारण हे आहे की या अपराधांमध्ये लिप्त लोकांना हा विश्वास आहे की कायद्यांची मशीन इतकी निष्क्रीय आहे की त्यांचे कोणीही काहीही बिघडवू शकत नाही. कायद्याची पकड जर कोठे कठोर जरी होत असेल तर ते लाच अथवा राजनैतिक दबावाच्या शक्तीद्वारा यापासून सुटका करतात. दुसरे कारण, त्यांचा हा विश्वास आहे की कोणतेही लक्ष बाहुबळाने प्राप्त केले जाऊ शकते. समस्त नागरिकसुद्धा कायद्याचे सहाय्यता घेण्याऐवजी बाहुबळ ठेवणाऱ्यापासून साहाय्य घेऊ इच्छितो. यासाठी त्या दैनिक जीवनाच्या सामान्य सुविधांच्या प्राप्ती आता कायद्याच्या साहाय्याने

कठीण होत चालल्या आहेत. काही मोठ्या शहरांच्या बाबतीत ही गोष्ट प्रसिद्ध आहे की लहान दुकानदार शहराच्या दादा लोकांना 'टॅक्स' (खंडणी) देत असतात. यासाठी की सुरक्षितपणे आपला व्यापार चालवू शकेल.

## भ्रष्टचारात वृध्दी

या नैतिक संकटाचे दुसरे रूप हे आहे की ज्या नैतिक वाईट गोष्टींना व्यक्तिगत जीवनात लोक वाईट समजतात, त्यांना सामूहिक बाबतीत अवलंबण्यास संकोच करीत नाहीत, तर या पापांना आता वाईटसुद्धा समजले जात नाही. उदा. विजेची चोरी आता शहरांत सर्वत्र आहे. टॅक्सच्या चोरीसाठी अगणित कारणे प्रचलित झालेले आहेत. सरकारच्या विभिन्न योजनांसाठी ज्या रकमा मंजूर करण्यात येतात, त्यांचा मोठा भाग नोकरशाहीच्या खिशात जातो.

माजी प्रधानमंत्री दिवंगत राजीव गांधी यांनी आपल्या एका भाषणात सांगितले होते की सरकार जर एक रुपया मंजूर करीत असेल तर १५ पैसेच जनतेपर्यंत पोहचतात. देशाच्या सेवेचे दावेदार नेता तर देशाच्या धनावर आपला अधिकार समजतात.

जिथपर्यंत नैतिकमूल्यांचा संबंध आहे, त्यांची परिस्थिती आणखीही वाईट आहे. व्यवहारात धोका आणि फसवणूक, खाद्य पदार्थांमध्ये भेसळ, कमी मोजणे आणि तोलणे, उत्तरदायित्वाच्या जाणीवेपासून आणि कर्तव्य पालनापासून वाचणे, खोटे, धोकेबाजी वर्तमान भारतीय समाजात वाईट प्रकारे प्रचलित आहे. हे सर्व पाप मानव समाजात उपद्रव निर्माण करतात. यामुळे जनता आणि विशिष्टजन सर्वच त्रस्त आहेत.

## कायद्याचे उल्लंघन

या नैतिक संकटाने असे वातावरण उत्पन्न करून टाकले आहे की ज्यामध्ये नैतिक गुणांचा अवलंब करणे खूप कठीण झालेले आहे. ईमानदारीवर चालणे कठीण झालेले आहे आणि खोटारडेपणा अर्थात बेईमानी सोपे झाले आहे. परिणामजनक कायद्याचे पालन सुरक्षा प्रदान करीत नाही. तर त्याच्या उल्लंघनात सुरक्षितता आहे. शांतीप्रिय नागरिक महत्त्वहीन आहे आणि बाहूबल आणि अपराधिक प्रवृत्तीची व्यक्ती सन्माननीय! जर तुम्ही धोखाधडी करण्यात तरबेज आहात तर संपत्ती आणि सत्ता तुमचे पाय चाटतील, परंतु जर तुम्ही सरळ आणि स्वच्छ पद्धतीने व्यापार करु इच्छित असाल तर पूर्ण जीवन अभावग्रस्त राहाल.

## नैतिक बिघाडाचा उपाय

या नैतिक बिघाडाने प्रत्येक निष्ठावान भारतीय त्रस्त आहे. यांच्या प्रभावी उपायाचे विभिन्न प्रकार सांगितले जातात, ज्यांच्यामध्ये सर्वांत जास्त दोन प्रकार खूप

प्रसिद्ध आहेत. एक हा की मानव स्वभावाच्या दृष्टीने लालची आणि स्वार्थी आहे. त्याच्या नष्टतेपासून वाचण्यासाठी कायद्याची सहाय्यता पाहिजे आणि असा उपाय अवलंबीला पाहिजे ज्याच्या भयाने तो बिघाडापासून वाचून राहील. या पध्दतीची सर्वांत मोठी कमतरता ही आहे की स्वत: कायदा लागू करणारे तर माणसे असतात ज्यांची विचासरणी वाईट असेल तर त्यांच्यावर तो कायदा लागू केला जातो, त्याचा वाईट परिणाम त्यांच्यावर होतो. अशा नैतिक दोषांचा उपाय त्याच वेळेस आणि त्याच स्थितीमध्ये संभव आहे जेव्हा हृदय आणि बुध्दी यांचा सुधार केला जाऊ शकेल. हृदय व मन परिवर्तन केले जाईल.

दुसरे प्रचलित समाधान आहे धर्म आणि धर्माच्या नैतिक शिकवणुकी, परंतु बरेच धर्म आध्यात्मिकता आणि सामूहिक व व्यक्तिगत नैतिक गुणांना एकमेकांपासून अगदी वेगळे ठेवतात. काही धर्म असे आहेत, ज्यांच्यात आध्यात्मिकता आणि आत्मिक शुध्दीचे एकमात्र साधन संन्यास आहे. जितके अधिक आध्यात्मिक चरणांना आपण पार करत जाल, तितके अधिक आपण सामान्य आणि जीवनाच्या बाबींपासून वेगळे होत जाल. यांच्यामध्ये काही असे आहेत जे नैतिकतेला सीमित अर्थांमध्ये घेतात. जसे ख्रिस्तीजवळ दया, सहिष्णुता आणि स्नेहच मूलत: नैतिक मूल्य आहेत. सामाजिक नैतिकतेच्या शिकवणीला कोणतेही स्थान नाही. यासाठी ती सामाजिक जीवनाच्या बाबतीत कोणतेही निर्देश देत नाही. अहिंसेची शिक्षा देणारे धर्म बौध्दमत आणि जैनमत सामाजिक नैतिकतेला आध्यात्मिक जीवनापासून पृथक ठेवत असतात. याचे कारण हे आहे की यांच्याजवळसुद्धा आध्यात्मिक पराकाष्ठा सांसारिक जीवनाचा त्याग आहे.

नैतिक बिघाडाच्या या सर्वांगीण संकटात आज प्रत्येक नागरिक जो परंपरागत विद्वेष तथा अज्ञानतेच्या दुराग्रहात लिप्त नाही तो एक अशा वैचारिक आणि व्यावहारिक व्यवस्थेच्या शोधात आहे जी यांचे समाधान करू शकेल आणि संसारवाद आणि स्वार्थवादाचे मानसिकतेवर नियंत्रण आणण्यास मानवाची सहाय्यता करू शकेल. सत्य आणि न्यायाचे केवळ भ्रामक शब्द आणि घोषणांना प्राधान्य नाही तर या बाबतीत व्यापक मार्गदर्शनसुद्धा द्यावे. तो धर्म आणि आध्यात्मिकतेला विचित्र कर्मकांडांचा आणि विचारांचा संग्रह न मानो, तर त्यांना वैयक्तिक आणि सामाजिक जीवनाच्या सुधाराचा माध्यम बनवावे. नैतिक मूल्यांना मात्र व्यक्तिगत आणि खाजगी जीवनापर्यंत न राहाता, तो समाज निर्माणाचा आधार बनावा.

## इस्लामची शिकवण

इस्लाम एक अशीच वैचारिक आणि व्यावहारिक व्यवस्था आहे. इथपावेतो की उपासनेलासुद्धा नैतिकतेशी जोडतो. जास्त सत्य गोष्ट ही आहे की याच्या निकट

ईशप्रसन्नतेचा मार्गसुध्दा नैतिक मूल्यांच्या निष्ठापूर्ण आचरणावरुन जवळून जात असतो.

तो चरित्र आणि आचरणाला मोमिन (अल्लाहचा अतिशय आज्ञाधारक व ईशभिरू दास) च्या जीवनात केंद्रीय दर्जा देत असतो. तो संसारत्यागाऐवजी सामाजिक जीवन निर्माण आणि सुधाराला सत्य धर्मउद्देश घोषित करीत असतो. त्याने ईशदूत पैगंबर मुहम्मद (स.) यांचे सद्गुण ज्याप्रकारे कथित केले आहेत, ते फार महत्त्वपूर्ण आहेत. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

''नि:संशय तुम्ही नैतिकतेच्या उच्च स्तरावर आहात.'' (दिव्य कुरआन, ६८:४)

एका दुसऱ्या ठिकाणी म्हटले गेले आहे,

''हे पैगम्बर (स.) ही अल्लाहची मोठी कृपा आहे की तुम्ही या लोकांसाठी फार कोमल स्वभावी ठरला आहात. एरवी जर तुम्ही एखादे वेळी तापट स्वभावी व पाषाणहृदयी असता तर हे सर्वजण तुमच्यापासून दूर गेले. यांचे अपराध माफ करा, यांच्यासाठी क्षमेची प्रार्थना करा, आणि धर्मकार्यात यांनासुद्धा सल्लामसलतीत सहभागी ठेवा. मग जेव्हा एखाद्या मतावर तुमचा निश्चय दृढ होईल तेव्हा अल्लाहवर भरोसा करा, अल्लाहला ते लोक प्रिय आहेत जे त्याच्या भरोशावरच काम करतात.''

(दिव्य कुरआन, ३:१५९)

या आयतमध्ये पैगंबर मुहम्मद (स.) अल्लाहची त्यावर दया व कृपा असो यांच्या ईशदुतत्वाच्या दर्जास कशाप्रकारे जोडले गेले आहे, हे विशेष लक्ष देण्यायोग्य आहे. एका अन्य ठिकाणी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या नैतिक गुणांना या प्रकारे कथन गेले आहे,

''मी तुमच्यामध्ये खुद्द तुमच्यामधूनच एक प्रेषित पाठविला जो तुम्हाला आमचे संदेश ऐकवीत आहे आणि तुमचे जीवन पवित्र करून तुम्हाला ग्रंथ व विवेकाची शिकवण देत आहे आणि तुम्हाला त्या गोष्टी शिकवीत आहे ज्या तुम्हाला माहीत नाही.''

(दिव्य कुरआन, २:१५१)

## सामाजिक नैतिकता

सामाजिक नैतिकतेला विभिन्न रूपांमध्ये धार्मिक जीवनाची ओळख आणि उपासनेचा एक उद्देश सांगितले गेले आहे. याला मोमिन व्यक्तींची विशिष्टता सांगून कुरआनने हे स्पष्ट करून टाकले आहे की ईश्वराने सत्य धर्म (इस्लाम) अवतरित केला आहे की मनुष्याने त्यावर आचरण करून एकीकडे उपासनेचा हक्क अदा करावा आणि दुसरीकडे मानवाच्या व्यक्तिगत आणि सामाजिक जीवनास सुधारले जाऊ शकेल. काही ठिकाणांवर तर मानवांमध्ये सत्य व न्यायाची स्थापना आणि सद्व्यवहाराला या धर्मास अवतरित करण्याचा उद्देश घोषित केला गेला आहे.

कुरआन अवतरणाच्या प्रारंभिक काळात पैगंबर मुहम्मद (स.) यांना आदेश दिला की आपल्या पालनकर्त्यांच्या कृतज्ञतेचा हक्क अदा करा. कुरआनमध्ये आहे.

"अनाथावर सक्ती करू नका आणि याचकाला (मागणाऱ्याला झिडकारू नका.) (दिव्य कुरआन,९३:९-१०)

ईशदूतत्त्वाच्या मिशनपूर्तीसाठी जो आदेश दिला गेला आहे, त्यामध्ये विशुद्ध ईशपरायणतापूर्ण सामाजिक नैतिकतेचे सामंजस्य याप्रकारे स्थापित केले गेले आहे की यापेक्षा उत्कृष्ट पध्दत शक्य नव्हती. कुरआनमध्ये आहे,

"हे वेष्टून पहुडणाऱ्या, उठा आणि खबरदार करा आणि आपल्या रबच्या महत्तेची घोषणा करा आणि आपले कपडे शुचिर्भूत ठेवा आणि घाणीपासून दूर राहा. आणि उपकार दाखवू नका. अधिक प्राप्त करण्यासाठी आणि आपल्या रबसाठी धैर्य राखा." (दिव्य कुरआन,७४:१-६)

परंतु यापासून बाह्य स्वच्छता नीटनेटकेपणासुद्धा अपेक्षित आहे. उपकार जतविण्याससुध्दा इन्कार केला गेला आहे. यासाठी की हा एक दोष आहे. नैतिक पावनता आणि नैतिक अशुध्दतेला ईशदूत (प्रेषितां)च्या खऱ्या मिशनास अशाप्रकारे जोडले गेले आहे की जणू ते एकमेकांचे अतुट अंग आहेत.

सत्य धर्माचा उद्देश न्याय स्थापना सांगितला गेला आहे. सांगितलेले आहे की आध्यात्मिकता लौकिक जीवनत्यागाचे नाव नाही. तर हे आहे की ईशप्रसन्नतेसाठी न्याय स्थापनेचा अथक प्रयत्न केला जावा.

"आम्ही आपल्या प्रेषितांना अगदी स्पष्ट निशाण्या व सूचनेसहित पाठविले, आणि त्यांच्याबरोबर ग्रंथ आणि संतुलन उतरविले जेणेकरून लोकांनी न्यायाधिष्ठित व्हावे." (दिव्य कुरआन,५७:२५)

एका सारगर्भित आयतीत केवळ न्यायच नाही, तर अन्य नैतिक गुणांचासुद्धा आदेश दिला गेला आहे.

"आणि अल्लाह न्याय आणि भलाईची, नातेवाईकांचे हक्क अदा करण्याची आज्ञा देतो, आणि दुष्कर्म व अश्लीलता आणि जुलूम व अत्याचाराची मनाई करतो, तो तुम्हाला उपदेश करतो. जेणेकरून तुम्ही बोध घ्यावा." (दिव्य कुरआन,१६:९०)

एका अन्य वचनात ईशपरायणता आणि न्यायाचे प्रत्यक्ष रूपाने नाते जोडले गेले आहे.

"आणि पहा एका गटाने तुम्हाला इतके भडकवू नये की तुम्हीदेखील त्यांच्या मुकाबल्यात अनुचित अत्याचार करावे. न्यायाने काम घ्या हे ईशपरायणतेहून जास्त उत्कृष्ठ ठरते." (दिव्य कुरआन,५५:२)

मोमिन व्यक्तिंचे गुण कथन करतेवेळी ईश्वराने कुरआनात अनेक स्थानांवर सामाजिक गुणांना नमाज आणि पालकर्त्यांच्या उपासनेसोबत कथन फर्माविले आहे,

"त्या व्यक्ती आपल्या अमानती आणि आपल्या वचनांचा व करारांचा मान राखतात." (दिव्य कुरआन, २३:८)

एका अन्य ठिकाणी हे सांगितले गेले आहे,

"आणि त्यांच्या मालमत्तेत हक्क आहे याचकांचा व वंचितांचा."

(दिव्य कुरआन, ५१:१९)

एका ठिकाणी विस्तारपूर्वक ईश्वराने प्रामाणिक दासांचे सद्गुण कथन केले आहेत,

"जो खर्च करतात तो न फाजील खर्च करतात न कंजुषपणा, जे अल्लाहशिवाय इतर कोणत्याही देवाचा धावा करीत नाही. अल्लाहने निषिध्द ठरविलेल्या कोणत्याही जीवाला हकनाक ठार करीत नाहीत आणि व्यभिचारही करीत नाहीत, हे कृत्य जो कोणी करील तो आपल्या गुन्ह्याचे फळ भोगेल. आणि जे असत्याचे साक्षी बनत नाहीत आणि एखाद्या वायफळ गोष्टीजवळून गेल्यास ते सज्जनाप्रमाणे निघून जातात."

(दिव्य कुरआन, २५:६७-७२)

सामाजिक नैतिकतेला धर्मपरायण जीवनाचा अभिष्ट गुण ठरवून देण्यासाठी पैगंबर मुहम्मद (स.) यांचे अनेक कथन आहेत. प्रेषितांनी सांगितले,

'विधवा आणि गरजुंसाठी धावपळ करणारा व्यक्ती त्या व्यक्तीसारखा आहे जो अल्लाहच्या मार्गात जिहाद (धर्मयुध्द) करीत असतो. उल्लेखकर्ता म्हणतो की मला असे आठवते की नबी (स.) यांनी हेसुद्धा फर्माविले होते की तो असा आहे. जो रात्री नमाजमध्ये उभा राहतो आणि ढिला होत नाही, आणि तो त्या व्यक्तीसमान आहे, जो दिवसाचे उपवास (रोजे) सतत ठेवतो." (हदीस: बुखारी)

इस्लामने अशाप्रकारे धर्मपरायणतेला सामाजिक आणि समष्टीय नैतिकतेचे अंग बनविले आहे म्हणून ईशपरायणता आणि ईश्वराचे भय, स्वर्गाची अपेक्षा शेवटच्या (कयामतीच्या) प्रकोपापासून वाचण्याची अभिलाषा, हे सर्व मानवाला जगाच्या मोहपाशापासून लांब ठेवत असते. या शिकवणुकींचा गुण हा आहे की त्या साध्या आहेत, अवघड नाहीत. मानव स्वभावच्या कमतरतेचा मान ठेवला गेला आहे आणि त्याच्याकडून यथासामर्थ्य आचरण इच्छिले आहे. नैतिक बिघाडाच्या या काळात अशाच वैचारिक आणि व्यावहारिक व्यवस्थेची नितांत गरज आहे. हे ते अमृत आहे, ज्याच्या स्रोतास विद्वेष आणि दुराग्रहाच्या काळोखाने लपवून ठेवले आहे.

-०- समाप्त -०-